# अंधेर नगरी

## (लहान मुलांसाठी)

लेखक - मतीन तारिक बागपती

अनुवादक - अब्दुर्रहमान शेख

*''अल्लाह, असीम, दयावंत व कृपावंतच्या नावाने''*

# अंधेर नगरी चौपट राजा

फार दिवसांपूर्वीची गोष्ट आहे गुरु आणि शिष्य जगाच्या सफरीवर निघाले होते. जाता जाता ते एका शहरात आले. शहराचें नाव 'अन्यायी नगर' होते. नाव ऐकल्यावर गुरुला आश्चर्य वाटले. दोघे पुढे निघाले. बाजारात जाऊन मालाचे भाव विचारू लागले. तेव्हा माहीत झाले की धान्य दूध, तूप सर्व वस्तु एक टका शेरभरच्या भावाने विकल्या जात आहेत.

हे पाहिल्यावर गुरुला आणखीन आश्चर्य वाटले की येथे तर प्रत्येक वस्तू ''एक टका शेर भर'' या भावाने विकली जाते. शिष्यांला मात्र फार आनंद झाला. येथे तर सर्व वस्तू अतिस्वस्त आहेत. येथे राहिल्यास खूप दूध आणि तुप खावयास मिळेल आणि आपण तब्बेतीने चांगले धडधाकट बनून जाऊ.

गुरुने शिष्याचे बोलणे ऐकूण त्याला सांगितले, ''भाऊ या ठिकाणी थांबणे योग्य नाही. हे शहर तर मला विसंगत वाटते. येथे तर लहान आणि मोठ्यात काहीच

अंतर नाही. म्हणून या शहरातून शक्य होईल तितक्या लवकर निघून दुसऱ्या शहराकडे कुच करणे आवश्यक आहे.'' परंतु शिष्याने मात्र त्याच शहरात राहाण्याची जिद्द केली. शेवटी ते तिथेच राहिले.

एके दिवशी दोघे फिरायला बाहेर पडले. फिरता फिरता त्या शहराच्या राजाच्या दरबारात आले. दरबार खूप सजवून ठेवला होता. राजा आपल्या राजसिंहासनावर मोठ्या दिमाखाने विराजमान होता आणि त्याच्यासमोर एक खटला चालला होता. दरबारात अनेकजण होते. हे दोघेसुध्दा तिथेच उभे राहून खटल्याची सुनावणी ऐकू लागले.

विचारपूस केल्यानंतर कळले की एका चोराने एका सावकारावर दावा केला आहे. तो चोर आणि त्याचा एक साथी सावकराच्या घरात चोरी करण्यास घुसताना व भिंतीला भोक पाडताना भिंत साथीदारांच्या अंगावर पडून तो ठार झाला. याचा मोबदला तो सावकाराकडून घेऊ इच्छित होता.

राजाने चोराचे म्हणणे ऐकून सावकाराला विचारले, भिंत अशी का बनविली होती? त्याने उत्तर दिले, महाराज!

ह्यात माझे काय चुकले? हे तर घर बनविणाऱ्या गवंड्याला विचारा. राजाने गवंड्याला दरबारात हजर होण्याचा आदेश दिला. गवंडी दरबारात हजर झाला आणि सांगितले की महाराज! भिंत बनवताना जो चिखल केला तो चांगला नव्हता म्हणून चिखल बनविणाऱ्या गड्याला विचारावे की त्याने खराब चिखल का बनविला होता?

म्हणून चिखल करणाऱ्या गड्याला बोलविण्यात आले. त्याने सांगितले की पाणाड्याने अधिक पाणी टाकले त्यामुळे चिखल पातळ झाला होता. राजाने पाणाड्याला बोलाविले. त्याने सांगितले, सरकार! हत्ती जोरात समोरून येत होता. भीतीने पाण्याचे भांडे हातातून खाली पडले आणि सर्व पाणी खाली पडून चिखल पातळ झाला.

राजांने हत्तीच्या मालकाला बोलाविले त्याने सांगितले की एक स्त्री पायात घुंगरू घालुन येत होती. त्या स्त्रीच्या घुंगरुचा आवाज ऐकून हत्ती बिथरला. हे ऐकल्यानंतर राजाने त्या स्त्रीला बोलाविले. तिने सांगितले, सरकार! सोनाराने पायातले घुंगरूच अशा प्रकारे बनविले की त्यांचा आवाज जास्तच होतो. शेवटी सोनाराला बोलाविले गेले त्याने काहीच उत्तर दिले नाही. म्हणून राजाने

सोनाराला फाशी देण्याचा आदेश दिला. आदेश मिळताच शिपायांनी सोनाराला फाशी देण्यासाठी नेले. परंतु जेव्हा फासावर त्याला चढवले तेव्हा दोराचा फास फार मोठा होता. ही गोष्ट लोकांनी राजाला सांगितली तेव्हा राजा म्हणाला, एखाद्या जाड माणसाला शोधा आणि फासावर चढवा.

शिपाई दरबारात जाड्या माणसाचा शोध घेऊ लागले. तिथे शिष्यासारखा जाड दुसरा कोणीच नव्हता. शिपायांनी त्या शिष्यालाच फासावर चढविण्यासाठी पकडले. आता शिष्य फार घाबरला आणि गुरुला म्हणू लागला, "कसेही मला वाचवा."

गुरुजी म्हणाले, "मी सांगत होतो की येथे राहाणे योग्य नाही: ही अंधेरी नगरी आहे. म्हणून तर प्रत्येक वस्तू एकटका एक शेरभर या भावाने विकली जात आहे. आता तुला परिणाम कळून चुकला. शिष्य काय उत्तर देणार? तो तर फासाचे नाव ऐकूनच पिवळा पडला होता. परंतु गुरु शेवटी गुरु होता. त्याने उपाय केला आणि फाशीच्या वेळी स्वत: पुढे येऊन म्हणू लागला, "सरकार! मला फाशी द्या. याला फासावर चढवू नका."

राजाने कारण विचारले तर गुरुजीने सांगितले, "मी माझी कुंडली पाहिले तेव्हा मला कळले की यावेळी ज्याला फाशी दिले जाईल तो सरळ स्वर्गात जाईल."

राजाने हे ऐकल्यावर म्हणाला, "जर ही वेळ इतकी शुभ आहे फाशी दिलेला मनुष्य सरळ स्वर्गात पोहचेल तर मला फासावर चढवावे." राजाचाच तो हुकूम! हुकूमाप्रमाणे राजाला फाशी दिली. त्यानंतर गुरुजी आणि शिष्य तेथून त्वरित निघून गेले, कारण दुसरे एखादे संकट समोर न येवो. ही अंधेर नगरी तर आहेच परंतु राजासुध्दा चौपट आहे, म्हणून तर विचार करून कधीच निर्णय घेतला नाही आणि आपल्या जीवाशी गेला.

# कोंबडीचे वाटप

फार जुनी गोष्ट आहे. एक गरीब मनुष्य होता. तो जंगलातून लाकडं तोडून शहरात विकत असे. त्यापासून मिळालेल्या पैशातून आपल्या मुलाबाळांचे पालनपोषण करीत असे.

एके दिवशी लाकडं विकून तो घरी परतत असताना रस्त्यात त्याला एक कोंबडी मिळाली. त्याने विचार केला की या कोंबडीला बादशाहला नजराना म्हणून दिल्यास तो खूष होऊन इनाम देईल. अशा प्रकारे आपली गरीबी दूर होईल. हा विचार करून तो घरी न जाता बादशाहाच्या दरबारात गेला आणि कोंबडी भेट दिली.

एका कोंबडीला पाहून बादशाह हसून म्हणाला, ''अरे लाकूडतोड्या! माझ्या घरात तर सहा माणसं आहेत. मी, माझी बायको दोन मुलं आणि दोन मुली. या कोंबडीचे वाटप कसे करावे?''

लाकूडतोड्या म्हणाला, ''महाशय! हे काही कठीण काम नाही. आपण एक सुरी मागवा, मी त्वरित वाटपाचे काम करून टाकतो.''

बादशाहने सुरी मागविली. लाकूडतोड्याने प्रथम कोंबडीचे डोके वेगळे केले आणि बादशाहाला भेट देताना म्हणाला, "बादशाह राज्यरूपी शरीरात डोक्याचे स्थान (उंचस्थान) राखतो म्हणून कोंबडीच्या शीराचा भाग बादशाहसाठी आहे." नंतर त्याने कोंबडीची पाठ कापून राणीसमोर ठेवली आणि सांगितले, "खानदानाची देखभाल, घराची काळजी आपणावर आहे म्हणून हा पाठीचा कणा तुमचा आहे."

त्यानंतर कोंबडीचे दोन्ही पाय कापून त्याने दोन्ही राजपुत्रांना एक एक दिले आणि सांगितले, "बादशाह! या पायाद्वाराही आपण दाखविलेल्या मार्गाने हे चालतील."

शेवटी कोंबडीचे पंख व बाजू दोन्ही राजपुत्रींना देत म्हणाला, "हे परधन आहे त्यांना महालातून सासरी जायचे आहे."

असे म्हणत त्याने आपले काम पूर्ण केले. परंतु पूर्ण दरबार आश्चर्यचकित झाला. बादशाहाचे कुटुंब विचार करू लागले की त्यांना भविष्यात कसे वागायचे आहे. बादशाहाने प्रसन्न होऊन लाकूडतोड्याला भरपूर बक्षीस दिले आणि लाकूडतोड्या बादशाहला आर्शीवाद देत देत आपल्या घरी पोहचला.

# सदाचाराचा बदला

फार दिवसांपूर्वीची गोष्ट आहे. एका राजाने आपल्या प्रजेला आदेश दिला की कोणीही दानधर्म करू नये. असे कोणी जर केले तर त्याचे हात कापले जातील.

सर्व लोक या आदेशाने भयभीत झाले. सर्वांनी गरीबांना काही देण्यासाठीचे हात रोखून धरले. गरीब लोक उपाशी मरू लागले.

यादरम्यान एक फकीर एका स्त्रीच्या दारावर आला. तो फार दिवसांपासून उपाशी होता व अशक्त झाला होता. त्याने भीक मागितली व म्हणू लागला, "मी अनेक दिवसांपासून उपाशी आहे माई! काही खायला तरी दे!"

त्या स्त्रीने नाविलाज प्रकट केला व म्हणाली, "तुला कसे देऊ, राजाचा आदेश आहे की दानधर्म केला तर त्याचे हात कापले जातील." त्या फकीराने न ऐकता सांगितले, "खुदासाठी काही तरी दे माई! फार भूक लागली आहे."

खुदाचे नाव ऐकून त्या स्त्रीला दया आली. तिने दोन भाकरी गुपचूप फकीराला दिल्या. राजाची माणसं शोधात होती. या घटनेची खबर राजाला दिली गेली. राजाने दरबारात बोलावून त्या स्त्रीचे दोन्ही हात कापून

टाकले. ती स्त्री रडत रडत दरबाराच्या बाहेर पडली. त्याचा मुलगा तिच्या काखेत होता. मुलगा आईच्या रक्ताने लतपत झाला. परंतु राजाच्या भीतीने त्यांच्याकडे कोणीही पाहतसुध्दा नव्हते.

ती स्त्री घराकडे परत जात असताना रस्त्यात तिला फार तहान लागली. ती तहाणेने व्याकूळ झाली होती. रस्त्यात एक ओढा दिसला. तिने बसून पानी पिण्याचे ठरविले. परंतु जशी ती पाणी पिण्यासाठी ओणवी झाली तेवढ्यात तिच्या हातून तिचा मुलगा पाण्यात पडला. ती घाबरून मोठमोठ्याने रडू लागली. अचानक तिकडून दोन माणसे येतांना दिसली. जवळ येऊन त्यांनी त्या स्त्रीला विचारले, ''काय झाले, का रडते?''

तिने रडत रडत उत्तर दिले, ''माझा मुलगा पाण्यात पडला आहे, तो पाहा बुडत आहे.''

हे ऐकताच एकाने पाण्यात उडी टाकून त्या मुलाला बाहेर काढले. नंतर त्यांनी कापलेले हात पाहून स्त्रीकडून पूर्ण कहाणी ऐकून घेतली. त्यांना फार दु:ख झाले. त्यांनी अल्लाहजवळ त्या स्त्रीचे हात पूर्ववत होण्यासाठी प्रार्थना केली.

अल्लाह या सृष्टीचा निर्माता आहे. तो त्याला वाटेल तसे करतो. दोन्ही माणसांनी मन:पूर्वक प्रार्थना केली होती.

त्यांची प्रार्थना अल्लाहने स्वीकारली आणि स्त्रीचे हात पूर्ववत झाले.

आपल्या हातांना व्यवस्थित झालेले पाहून त्या स्त्रीला अत्यानंद झाला. तिने अल्लाहची कृतज्ञता व्यक्त केली. नंतर तिने त्या माणसांना विचारले, "तुम्ही कोण आहात?" त्यांनी सांगितले, "आम्ही तू दिलेल्या त्या दोन भाकरी आहोत, ज्यांना तू बादशाहाची पर्वा न करता उपाशी फकीराला दिले. अल्लाहचे उपकार मान की तुला तुझे दोन्ही हात परत मिळाले व तुझा मुलगासुध्दा."

मुलाला घेऊन स्त्री घरी परत आली. तिला सुखरूप पाहुन सर्वांना आश्चर्य वाटले. राजाजवळ जेव्हा खबर गेली तेव्हा त्याने त्या स्त्रीला आपल्यासमोर पुन्हा बोलाविले. तिचे हात व्यवस्थित पाहून राजाला आश्चर्य वाटले. जेव्हा स्त्रीने आपली पूर्ण कहाणी ऐकविली तेव्हा राजा थरथर कापू लागला. त्याने मनापासून आपल्या अत्याचारासाठी अल्लाहजवळ क्षमायाचना केली. नंतर तो सदाचारी आणि दयावान राजा बनून राहिला.

# स्वकर्म महाकर्म

हामिद आणि शाहिद दोन्ही एकाच गावाचे रहिवाशी होते दोघे मित्र होते. एकत्र राहात, एकत्र अभ्यास करत आणि एकत्र खेळत होते. बोलता बोलता दोघे मोठे झाले. दोघांचे वडील शेतकरी होते. हामिद आपल्या वडिलासोबत कधीकधी शेतावर काम करीत असे. परंतु शाहिदला हे पसंत नव्हते. जेव्हा हामिद शेतावर जायचा तेव्हा शाहिद इतर मित्रांबरोबर गप्पागोष्टीत वेळ घालवायचा.

दुर्भाग्याने दोघांचे वडील एकाच दिवशी परलोकवासी झाले. आपापल्या घराची जबाबदारी दोघांवर येऊन पडली. हामिदच्या येथे दोन नोकर होते. तो शेतावर नोकरांबरोबर काम करत असे! नांगर चालवणे, बैलांची देखभाल किंवा चारा कापणे इ. शेतावरील सर्व कामें तो नोकरांबरोबर एकत्रित हसत खेळत करत होता. यामुळे त्याच्या शेताचे उत्पन्न वाढू लागले आणि हामिदचा परिवार एक सुखी परिवार बनला. इकडे शाहिदला आपल्या बापाची आयती कमाई भरपूर मिळाली होती. तो आपल्या दोस्तांबरोबर गप्पागोष्टी आणि पत्ते खेळण्यात वेळ घालवित असे. शेतावरील काम निघाल्यास तो

नोकरांना आदेश देत असे की नांगर चालवा आणि शेतावर मशागत करा. परंतु तो कधीच त्या नोकरांबरोबर शेतावर गेला नाही. त्याला शेताचे काम करण्याची सवयच नव्हती. त्याला त्याच्या मित्राच्या गराड्यातून सुटका मिळणे अशक्य होते.

याचा परिणाम जो व्हायचा तोच झाला. हळूहळू बापकमाई संपून गेली. शेतीवाडीसुध्दा चौपट झाली. कारण नोकरांना दुसऱ्याच्या नफ्या-तोट्यांचे काय पडले. आपल्या मर्जीनुसार नोकरांनी काम केले. शेवटी शाहिद गरीबीच्या दलदलीत पुरता फसून गेला.

शेवटी त्याला त्याच्या जुन्या मित्राची आठवण झाली. तो त्याला भेटण्यासाठी गेला. शाहिदने पाहिले की हामिद बैलांसाठी चारा कापत आहे. शाहिदला पाहून हामिद त्याच्याजवळ आला आणि सलाम करून हालहवालाची विचार पूस केली. शाहिद म्हणाला, ''बंधु! हाल काय आहे ते तू पाहात आहे. यावेळी शेतीवाडीची दशा चांगली नाही, तीन तीन नोकर आहेत परंतु मी तोट्यातच आहे. काही कळत नाही. माझ्या वडिलांनी मागे बरीच संपत्ती सोडली होती. तरी मी आता निर्धन बनलो आहे. तुमच्याजवळ तर जमीनसुध्दा थोडीच आहे. नोकरसुध्दा दोनच, परंतु काम तर चांगले आहे. याचे काय कारण?

हामिद म्हणाला, "प्रिय मित्रा! ह्यात एक लहानसे कारण आहे. काम करताना मी नोकरांना सांगतो, या एकत्र काम करू या आणि तुम्ही सांगता काम करा." शाहिद म्हणाला, "मला तुझ्या म्हणण्याचा अर्थ कळाला नाही." हामिद म्हणाला, "विचारी लोकांचे म्हणणे आहे की स्वकर्म महाकर्म." म्हणजे जो आपल्या हाताने काम करील तो पुढे मोठमोठे काम करून टाकतो. जो दुसऱ्यांच्या भरोशावर जगतो त्याचे प्रत्येक काम चौपट होते. मी याच तत्त्वाला अंगीकारले आहे. नोकरांसोबत मीसुध्दा शेतावर काम करत असतो. आतासुध्दा तुम्ही पाहता की मी बैलाचा चारा स्वत: कापत आहे. अल्लाहची कृपा आहे की त्याने माझ्या शेतीला हिरवीगार बनविली. तुम्हाला वाईट वाटले नाही तर मी खरे सांगू? तुम्ही तर नोकरांना आदेश देता की जा काम करा. आता तुम्हीच सांगा, ते कसे काम करत असतील? याचमुळे तुमची शेतीवाडी चौपट झाली. आतासुध्दा वेळ निघून गेलेली नाही. जमीन आहे, नोकर आहे आणि तुम्ही पण आहात. फक्त धाडसाची गरज आहे."

शाहिद म्हणाला, "दोस्ता! मी आता समजलो खरंच 'स्वकाज महाकाज' आहे. आता मी स्वत: काम करीन. चलतो, खुदा हाफीज !!

# सदाचारी कोळी

शेकडो वर्षांपूर्वीची गोष्ट आहे. एक राजा होता. तो फार दयाळू होता. प्रजेच्या दु:खात तो सामील होत असे आणि अशावेळी प्रजेची मदत करत असे. तो रात्री वेष बदलून राज्यात फिरत असे, जेणेकरून प्रजेचे सुखदुख त्याला कळत असे.

अशा प्रकारे तो फिरत असताना राजमहालापासून दूर निघून गेला. थकल्यावर तो नदीकाठी एका झाडाच्या खाली बसला. जवळच एक कोळी पाण्यात जाळे टाकून मासे धरत होता.

जेव्हा तो जाळे गुंडाळून जाऊ लागला तेव्हा त्याने झाडाखाली राजाला बसलेला पाहिला. कोळी जवळ गेला आणि म्हणाला, ''आपण नवीन आहात असे वाटते.'' राजा म्हणाला, ''होय! मी एक व्यापारी आहे. बाजूच्या देशाचा राहाणारा आहे. आपल्या कामासाठी येथे आलो होतो. परंतु वाट चुकलो. मी वाटच पाहत होतो की कोणी भेटला तर विचारीन. अल्लाहने तुम्हाला माझ्या समोर पाठविले.'' कोळी सदाचारी आणि ईशपरायण होता. राजाचे म्हणणे ऐकून त्याने आजूबाजूतील सुकलेली लाकड गोळा केली विस्तव पेटवून आग भडकविली आणि

त्यावर दोन चार मासे भाजून अनोळखी माणसासमोर ठेवले व म्हणाला, ''प्रथम आपण हे खा, जेणेकरून आपली थकावट दूर होईल. नंतर आपण मार्ग शोधत जाऊ या.''

जेवतांना राजाने कोळ्याजवळ आपल्या प्रजेविषयी विचारणा केली, त्याने उत्तर दिले की या देशाचा राजा सदाचारी आणि न्यायनिष्ठ आहे. गरीब आणि असहाय लोकांची सतत मदत करतो. अत्याचारी लोकांना शिक्षा देतो आणि अत्याचारपीडितांशी सद्व्यवहार करतो.

राजाने विचारले, ''तुम्ही कधी राजाला भेटला आहात काय?''

''नाही, मी राजाशी भेटू इच्छित नाही.'' कोळ्याने उत्तर दिले.

राजाने आश्चर्याने म्हटले, ''असे का? तुम्ही त्याची इतकी प्रशंसा करता आणि त्याला भेटूसुध्दा इच्छित नाही. हा काय मामला आहे?''

कोळ्याने उत्तर दिले, ''हे यासाठी की राजाने प्रत्येक व्यक्तीबरोबर न्याय आणि सहानुभूतीचा व्यवहार केला परंतु यात्रींच्या समस्यांकडे काहीच लक्ष दिले नाही.''

''ते कसे?'' राजा म्हणाला.

कोळ्याने उत्तर दिले ''ते असे की हा मार्ग जिथे आपण

बसलो आहोत, तो नगराकडे जातो. मधे जंगल आहे. परंतु राजाने रस्त्यात तहाणल्यांसाठी विहीर खणली नाही की मार्ग दाखविणारा कोणी वाटाड्या नेमला नाही. तसेच रस्त्यात खाण्यापिण्याचा काही एक प्रबंध नाही. जे लोक परदेशातून येतात ते आपल्या देशात जाऊन आमच्या देशाविषयी काय म्हणत असतील?''

राजा कोळ्याच्या बोलण्याने फार प्रभावित झाला त्याने विषय बदलण्यासाठी एका बागेकडे बोट दाखवून म्हटले ''ही बाग तुला मिळाली तर तू काय करशील?''

हे ऐकून कोळ्याने उत्तर दिले, ''जर असे झाले तर मी या बागेला यात्रींसाठी ठेवीन, जे येता-जाता या बागेत आराम करतील.''

राजा कोळ्याच्या या उत्तराने फार प्रसन्न झाला. राजदरबारात पोहचताच राजाने सर्वांत अगोदर हेच काम केले की कोळ्याला दरबारात बोलावून घेतले आणि संपूर्ण बाग त्याला देऊन टाकली. कोळ्याने अल्लाहची कृतज्ञता व्यक्त केली. त्याने राजाला जे वचन दिले त्याप्रमाणे करून दाखविले. प्रवासी बागेत थांबू लागले, पाणी, पिण्यासाठी व फळ खाण्यासाठी! प्रवासी बागेत येता-जाता आराम करू लागले.

राजानेसुध्दा प्रवाशांसाठी राजमार्गावर सुखसुविधा पुरविल्या. सर्व प्रवासी आरामात प्रवास करू लागले.

# तीन भाऊ

एका माणसाला तीन मुलं होती. एके दिवशी तिघांनाही त्याने आपल्याजवळ बोलावले आणि प्रत्येकाला वेगवेगळे काम करण्यासाठी दिले. मुलांना सांगितले, ''मी चार दिवसांनी तुमचे काम पाहीन. ज्याचे काम सर्वांत चांगले असेल त्याला बक्षीस देईन.'' तिन्ही मुले आपापले काम घेऊन प्रत्येकाच्या घरी गेले.

त्यांच्यापैकी मोठा मुलगा बुध्दिमान होता आणि कामातसुध्दा चपळ होता. त्याने विचार केला की हे काम तर मी दोन दिवसांत पूर्ण करेन. आताच या कामाला घेऊन का बसू! म्हणून तो आपल्या मित्रांसोबत खेळ खेळण्यास आणि मनोरंजनात मग्न झाला.

दुसऱ्या मुलाने विचार केला हे काम काही इतके कठीण नाही. हे जेव्हा करण्यास सुरवात करू तर त्वरित होऊन जाईल. म्हणून आजच सुरु करण्यात काय अर्थ? आता तर चार दिवस आहेत. हा विचार करून तोसुध्दा दुसऱ्या धंद्यात मग्न झाला.

परंतु तिसऱ्या मुलाने जो त्यांच्यापैकी सर्वांत लहान होता. त्याने विचार केला की दिवस तर फटाफट निघून जातात. मी तर सर्वांत वयाने लहान आहे. हळूहळू

आजपासूनच हे काम सुरु करतो म्हणजे चार दिवसांत पूर्ण होईल. हा विचार करून त्याने काम त्याचवेळी सुरु केले आणि चौथ्या दिवशी आरामशीर सर्व काम पूर्ण करून टाकले.

मधला मुलगा दुसऱ्या दिवशी आजारी पडला आणि त्याच्या हातून काहीच काम झाले नाही. मोठा मुलगा तिसऱ्या दिवशी काम करण्यास बसला. लवकर करण्यासाठी त्याने ते काम व्यवस्थित केले नाही. चौथ्या दिवशीसुध्दा त्याचे काम पूर्ण होऊ शकले नाही.

पाचव्या दिवशी या तिन्ही मुलांना त्यांच्या वडिलांनी बोलावून घेतले. बापाने त्यांचे काम पाहिले. मोठ्या मुलाचे काम खराब होते. बापाला फार राग आला. त्याने मोठ्या मुलाला सांगितले, ''हे तुझ्या गर्वाचे फळ आहे. कामाला सहज समजून टाळत राहिला आणि शेवटी काम खराब करून टाकले.''

मधला मुलगा आजारी होता. काहीच करू शकला नाही आणि शेवटी ओशाळला. लहान मुलाने जेव्हा स्वत: केलेले काम बापाला दाखविले तेव्हा बाप खूष झाला. बापाने आपल्या वचनानुसार बक्षीस दिले. खरे तर कामाला कधीही टाळू नये. वेळ आहे तर काम पूर्ण करण्यातच यशाचे गमक आहे.

# बाबरचे मानवताप्रेम

बाबर एक महान बादशाह होऊन गेला. त्याने हिंदुस्थानात मुगल साम्राज्याचा पाया रचला होता. बाबर तर परदेशातून आला होता. परंतु आपल्या सुस्वभावाने आणि नम्र व्यवहाराने त्याने येथील लोकांची मनं जिंकली होती. याविषयीची एक गोष्ट प्रसिध्द आहे.

सकाळची वेळ होती न्याहारी करून सर्व लोक आपापल्या कामात जुंपलेले होते. आगरामध्ये शाही महलसमोर एक मेहतरानी (झाडुवाली) साफसफाई करीत होती. जवळच तिचा बाळ खेळत होता. सडकेच्या पलीकडे हत्यारी राजपूत चकरा मारत होता. त्याला बाबरला ठार करायचे होते. कारण त्याचा बाप बाबरच्या हातून एका लढाईत मारला गेला होता.

त्याच वेळी एक हत्ती शाही अस्तबलातून सुटून सैरावैरा धावत होता. हत्ती बेभान झाला होता. लोक त्याला पाहून सैरावैरा पळत सुटले होते. एवढ्यात हत्तीने आपले तोंड त्या मेहतरानीकडे केले. हत्तीला आपल्याकडे येताना तीसुध्दा जीव वाचवून पळाली. परंतु मुलासाठी ती

मोठमोठ्याने ओरडू लागली. ''हाय! हाय! माझे बाळ! हाय माझे बाळं!!''

राजपूत युवकाने तिची आर्त हाक ऐकली, परंतु बाळ अस्पृश्य असल्याने त्याला वाचवण्याचा त्याने प्रयत्न केला नाही. मेहतरानीची आर्त हाक बाबरच्या कानावर पडली. बाबर बेचैन झाला. त्याने महालावरून उडी मारून हत्तीच्या डोक्यावर वार करून त्याला पिटाळून लावले. नंतर त्या मेहतरानीच्या बाळाला उचलून महालात निघून गेला. मेहतरानी आपल्या बाळाचा जीव वाचविल्यामुळे बाबरला अनेकानेक आशीर्वाद देऊ लागली.

तिकडे राजपूताच्या मनावर बाबरच्या या कृत्याने प्रभाव पडला. त्याने विचार केला की अशा चांगल्या बादशाहशी दुश्मनी ठेवणे योग्य नाही. नंतर तो बाबरचा मित्र बनला. बाबरने त्याचे जिंकलेले राज्य त्याला परत देऊन टाकले.

# कामचोरपणा वाईट आहे

काम करणे कामात मग्न राहाणे एक चांगली सवय आहे. ज्या माणसात ही सवय आहे तो सर्वांना आवडू लागतो. अशा लोकांचे कोणतेच काम अपूर्ण राहात नाही आणि ते जीवनात नेहमी सुखी राहतात.

याच्या विपरित जे लोक कामचुकार आहेत ते सर्वांच्या नजरेतून उतरतात. जगात त्यांना कुचकामी म्हटले जाते. जगात यशस्वी लोक नेहमीच कार्यमग्न राहातात आणि दुसऱ्यांनासुध्दा कार्यरत राहण्याची प्रेरणा देतात.

अशीच एक घटना अमेरिकेचे जनरल वॉशिंगटनविषयीची आहे. तो जनरल नेहमीच कार्यमग्न राहात असे. तो लहानात लहान काम स्वत:च्या हाताने करीत असे.

एकदा तो साध्या पोशारवात कुठेतरी जात होता. रस्त्यात त्याने पाहिले की काही शिपाई लाकडाच्या मोठ्या ओडक्याला उचलण्याचा प्रयत्न करीत होते. परंतु ते फार मोठे होते आणि त्याला उचलण्यासाठी आणखी लोकांची गरज होती. जवळच फौजेतील एक साहेब उभा होता. तो त्यांना आदेश देत होता की लवकर उचला. वाशिंगटन

घोड्यावरून खाली उतरून त्या साहेबाकडे गेला आणि विचारले की तुम्हीसुध्दा या कामात मदत का करीत नाही? जर तुम्ही मदत केली असती तर हे काम लवकर झाले असते.

साहेब म्हणाला, "काय तुम्हाला दिसत नाही की मी यांचा साहेब आहे?" येवढे ऐकून वॉशिंगटनने त्या साहेबाशी चर्चा करण्यात वेळ न घालवता स्वत: शिपायांना त्यांच्या कामात मदत केली. सर्वांनी मिळून तो लाकडी ओंडका उचलला. त्यानंतर वाशिंगटन त्या साहेबाला म्हणाला, "तुम्हाला भविष्यात मेहनतीच्या कामात माझ्या मदतीची गरज भासली तर मला बोलवा, मी जनरल वाशिंगटन आहे."

हे बोलून जनरल तेथून निघून गेला. परंतु साहेब घामाने ओलाचिंब झाला. तो साहेब आपल्या कामचुकार पणावर फार लज्जीत झाला.

※ समाप्त ※